महाराष्ट्रातील सागरी किल्ल्याचे प्रायोगिक नामांकन युनेस्कोकडे पाठविण्यासाठी या किल्ल्यांच्या संभाव्यतेच्या दृष्टीने तयार करण्यात आलेल्या स्थळ व्यवस्थापन आराखडा (Site Management Plan) प्राथमिक अहवालाच्या तिसऱ्या देयकास वित्तीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : पुवसं-२०२१/प्र.क्र.१७९/ सां.का.३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ मार्च, २०२५

**वाचा :-** १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.पुवसं-२०२१/प्र.क्र.१७९/सां.का.३, दिनांक २९.०६.२०२२
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.पुवसं-२०२१/प्र.क्र.१७९/ सां.का.३, दिनांक १८.१०.२०२२
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.पुवसं-२०२१/प्र.क्र.१७९/ सां.का.३, दिनांक १०.०३.२०२३
४) संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई यांचे जा.क्र.तंत्र/२०२४/ युनेस्को सागरी किल्ले तृतीय देयक/२२ दिनांक ०१.०१.२०२५ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याला समृध्द असा सागरी सांस्कृतिक वारसा लाभलेला आहे. महाराष्ट्रातील सागरी किल्ले यांची आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय स्तरावर प्रसिध्दी व्हावी या उद्देशाने या स्मारकांचे UNESCO जागतिक वारसा दर्जाकरीता नामांकन व्हावे, असा शासनाचा मानस आहे. सबब, या स्मारकांचे स्थळ व्यवस्थापन आराखडा (Site Management Plan) तयार करणे आवश्यक होते. महाराष्ट्रातील सागरी किल्ल्यांचे युनेस्को जागतिक वारसा नामांकनाकरिता प्रस्ताव तयार करण्यासाठी ई-निविदेद्वारे तज्ञ वास्तुविशारद संस्थेची निवड करण्यासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये गुरगाव, हरियाणा येथील तज्ञ वास्तुविशारद DRONAH संस्थेच्या न्युनतम दराच्या निविदेस मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र. २ व संदर्भ क्र. ३ अन्वये स्थळ व्यवस्थापन आराखडा तयार करण्याच्या कामाच्या अनुक्रमे प्रथम व द्वितीय देयकास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ ४ अन्वये संचालक,पुरातत्व व वस्तुसंग्रहालये यांनी सागरी किल्ल्यांचा स्थळ व्यवस्थापन आराखडा तयार करण्याच्या तृतीय देयकास वित्तीय मान्यता देण्याची विनंती केली आहे. आता महाराष्ट्रातील सागरी किल्ल्याचे प्रायोगिक नामांकन युनेस्कोकडे पाठविण्यासाठी या किल्ल्यांच्या संभाव्यतेच्या दृष्टीने तयार करण्यात आलेल्या स्थळ व्यवस्थापन आराखडा (Site Management Plan) प्राथमिक अहवालाच्या

तृतीय देयकाच्या कामाकरीता आवश्यक रू.१८,४०,८०० /- इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**०१.** या शासन निर्णयान्वये महाराष्ट्रातील सागरी किल्ल्याचे प्रायोगिक नामांकन युनेस्कोकडे पाठविण्यासाठी या किल्ल्यांच्या संभाव्यतेच्या दृष्टीने तयार करण्यात आलेल्या स्थळ व्यवस्थापन आराखडा (Site Management Plan) प्राथमिक अहवालाच्या देयकाच्या कामाकरीता आवश्यक रू.१८,४०,८०० /- (रु. अठरा लक्ष चाळीस हजार आठशे रूपयेमात्र) इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेड्डी -२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृति (००) १०३, पुरातत्वशास्त्र (०१) (०२) पुरातत्वशास्त्र संचालनालय (राज्य) (अनिवार्य), (२२०५ १३३८) ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

**०३.** संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

**०४.** हा शासन निर्णय विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग चार मधील नियम ११ नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१७१८३११७६९२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2025.03.18 13:09:36 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सां.का.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उपसचिव (सां.का. ३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती, सां.का.३.